वयाच्या 50/55 व्या वर्षापलिकडे किंवा अर्हताकारी सेवेची 30 वर्षे पूर्ण झाल्यानंतर शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे लोकहितास्तव सेवापुनर्विलोकन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक विपुस-1098/693/प्र.क्र. 68/98/15,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 14 डिसेंबर 1999.

पहा :- (1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरसी-1082/952/15, दिनांक 1 सप्टेंबर 1983.
(2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरसी-1085/1029/43/15, दिनांक 12 मे 1986.
(3) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरसी-1085/1029/43/15, दिनांक 1 एप्रिल 1989.
(4) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरसी-1085/1029/43/15, दिनांक 24 फेब्रुवारी 1993.

शासन परिपत्रक : शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या वयाच्या 50/55 व्या वर्षापलिकडे किंवा अर्हताकारी सेवेची 30 वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांची शासन सेवा पुढे चालू ठेवण्याची पात्रापात्रता आजमविण्यासाठी त्यांचे गोपनीय अहवाल, सचोटी व शारिरीक क्षमता या विहित केलेल्या निकषांच्या आधारे त्यांच्या प्रकरणांचे पुनर्विलोकन करुन सुयोग्य व कार्यक्षम अधिकारी/कर्मचारी यांनाच लोकहितास्तव शासन सेवेत पुढे चालू ठेवावे व अकार्यक्षम तसेच संशयास्पद सचोटी असणा-या अधिकारी/कर्मचा-यांना मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे. या धोरणाशी संबंधित सुस्पष्ट आदेश संदर्भाधीन परिपत्रकान्वये यापूर्वीच देण्यात आलेले आहेत. शासनाचे हे धोरण लक्षात घेऊन अधिकारी/कर्मचारी यांचे सेवा पुनर्विलोकन करावे अशा सूचना मंत्रालयीन विभाग तसेच विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेल्या सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना देण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(मीरा डफळापूरकर),
शासनाच्या उप सचिव.

प्रत

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील कार्यासन क्रमांक 5, 8, 11-अ, 12-अ, 13-अ, 19, 20-अ, 20-ब, 21, 26, 28, 28-अ, 31, 34-अ, 37, 38, निवास व्यवस्था नियंत्रक, मंत्रालय उपाहारगृहे, विज्ञान व तंत्रज्ञान कक्ष,
निवड नस्ती.

एच- 937(4000-12-99)